कारागृहात उत्पादन होत असलेल्या फिनाईल, साबण व इतर स्वच्छताविषयक वस्तुंबाबत...

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: जेएलएम ०५२५/प्र.क्र.९९/तुरुंग-२**

**दुसरा मजला, मुख्य इमारत,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १३ मे, २०२५.

**शासन परिपत्रक-**

राज्यातील काही कारागृहांमध्ये आंघोळीचे व कपड्यांचे साबण, दंतमंजन, फिनाईल इत्यादी स्वच्छताविषयक वस्तूंचे उत्पादन करण्यात येते. सदर वस्तूंचा समावेश कारागृहातील बंद्यांकरिता लागणाऱ्या गट ३ स्वच्छता विषयक वस्तूंमध्ये होतो. बंद्यांकरिता लागणाऱ्या स्वच्छताविषयक वस्तूंची खरेदी नियमोचित निविदा प्रक्रिया राबवून खुल्या बाजारातून करण्यात येते. त्याकरिता लागणारा खर्च उपलब्ध अनुदानातून भागविण्यात येतो. कारागृहात उत्पादन होत असलेल्या उपरोक्त वस्तुंचा वापर बंद्यांकरीता केला, तर त्यावर होणाऱ्या खर्चामध्ये बचत होऊ शकते.

२. ही उत्पादने कारागृहात तयार होत असल्याने, सूचित करण्यात येते की राज्यातील कारागृहातील बंद्यांकरिता आवश्यक आंघोळीचे व कपड्यांचे साबण, दंतमंजन, फिनाईल इ. स्वच्छताविषयक वस्तूंच्या उत्पादनात आवश्यकतेनुसार वाढ करुन त्यांचा पुरवठा सर्व कारागृहांना विहीत कालावधीत करण्याच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५१३१२२३३७००४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.05.13 12:25:11 +05'30'

**(सुग्रिव धपाटे)**

**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व कारागृह उपमहानिरीक्षक, नाशिक विभाग,
३. सर्व कारागृह अधीक्षक
४. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.